# महाराष्ट्र शासन

**क्रमांक: सावियो-२०२३/प्र. क्र. ४९१ /अजाक**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०९ जुलै, २०२४.

**विषय:** भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना मौजे ठाणा, फर्दापूर, ता. सोयगांव, जि. छत्रपती संभाजीनगर येथे भीम पार्क उभारण्याबाबत.

**संदर्भ:** १. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र, दिनांक २० सप्टेंबर, २०२३.
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०५ जानेवारी, २०१५.

**ज्ञापन:**

आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भांकित पत्रान्वये भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजनेंतर्गत मौजे ठाणा, फर्दापूर, ता. सोयगांव, जि. छत्रपती संभाजीनगर येथे भीम पार्क उभारण्याबाबतचा प्रस्ताव सादर केलेला आहे.

२. मौजे ठाणा, फर्दापूर, ता. सोयगांव, जि. छत्रपती संभाजीनगर येथे भीम पार्क उभारण्याच्या कामासाठी आराखडे/ नकाशे आणि रुपये ६४४८.७३ लक्ष इतक्या रकमेचे अंदाजपत्रके SUSHIL DESHMUKH AND ASSOCIATES, छत्रपती संभाजीनगर यांनी तयार केलेले असून उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, फर्दापूर व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, छत्रपती संभाजीनगर यांनी साक्षांकित केलेले आहेत. सदर बांधकामाचे अंदाजपत्रके महाराष्ट्र राज्याच्या सार्वजनिक बांधकाम विभागाने सन २०२२-२३करिता दिनांक २५ जुलै, २०२२ रोजी प्रकाशित केलेल्या State Schedule of Ratesप्रमाणे आहेत. सदर अंदाजपत्रकांच्या RECAPITULATION SHEETवर मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर आणि कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत विभाग, छत्रपती संभाजीनगर यांनी प्रतिस्वाक्षरी (Counter Signed) केलेली आहे.

३. सदर अंदाजपत्रकाची सार्वजनिक बांधकाम विभागाने (शासन स्तरावरील) तपासणी करुन सदर अंदाजपत्रकाच्या परिगणित केलेल्या रुपये ४९७४.५४ लक्ष इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. सदर मान्यता शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १७ एप्रिल, २०१५ व २० सप्टेंबर, २०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-१, उप विभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्रमांक १३४ (१) अनुक्रमांक १मधील सुधारित अट ५.२ अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

५. सदर मौजे ठाणा, फर्दापूर, ता. सोयगांव, जि. छत्रपती संभाजीनगर येथे भीम पार्क उभारण्याबाबतच्या कामासाठी येणारा खर्च :

मागणी क्रमांक एन-३
मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण,
०१, अनुसूचित जातींचे कल्याण,
(०४) भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना
(०४) (०१) भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना (अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम)
२७, लहान बांधकामे
२२२५ F ०८५

या अंतर्गत सन २०२४-२५ या चालू वर्षासाठी उपलब्ध असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

६. सदर विपश्यना केंद्र उभारणीची सुरुवात सन २०२४-२५ या आर्थिक वर्षापासून सुरु करण्यात यावी.

७. संदर्भाकित परिपत्रकाप्रमाणे म्हणजेच सन २०२४-२५ या वर्षासाठी निधी उपलब्धतेच्या अधिन राहून / वित्त विभागाकडून उपलब्ध होणाऱ्या निधीच्या अधिन राहून रुपये १६५०.०० लक्ष निधी वितरीत केला जाईल. तद्नंतर सन २०२५-२६ व २६-२७ या वर्षासाठी अनुक्रमे रुपये १६५०.०० लक्ष व रुपये १६७४.५४ लक्ष निधी वितरित करण्यात येईल.

८. सन २०२४-२५साठी वितरित करण्यात आलेल्या रुपये १६५०.०० लक्ष निधीचा विनियोग झाल्याचे जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर यांच्या स्वाक्षरीचे कागदपत्रे/ उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. सदर कागदपत्रे/ उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर झाल्यावर या कार्यासनाशी (अजाक) संबंधित अधिकारी प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, छत्रपती संभाजीनगर किंवा सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, छत्रपती संभाजीनगर यांच्यासह प्रस्तुत भीम पार्कची स्थळ पाहणी करतील. सदर संबंधित अधिकारी स्थळ पाहणी करुन पुढील वर्षासाठी निधी वितरित करण्याबाबत ना हरकत प्रमाणपत्र देतील. सदर ना हरकत प्रमाणपत्र दिल्यानंतर सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, छत्रपती संभाजीनगर यांच्यामार्फत दुसऱ्या वर्षासाठी निधीची मागणी करण्यात यावी. त्यानंतर शासनाकडून प्रस्तुत प्रस्तावास निधी वितरित करण्यात येईल.

९. सदर मौजे ठाणा, फर्दापूर, ता. सोयगांव, जि. छत्रपती संभाजीनगर येथे भीम पार्क उभारणी करताना विषयांकित योजनेचे नियम, तरतुदी, बाबी, अटी आणि वित्तीय अधिकारांतर्गत असलेल्या अटी यांचे पालन होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१०. तसेच, मौजे ठाणा, फर्दापूर, ता. सोयगांव, जि. छत्रपती संभाजीनगर येथे भीम पार्क उभारणी करताना पुढील बाबींची पूर्तता करण्याची जबाबदारी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य

विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील संबंधित सहाय्यक आयुक्त, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त व आयुक्त यांची राहील :

अ. काम सुरु करण्यापूर्वी नमूना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजुरी घेऊनच सुरु करावे.

ब. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

क. प्रत्यक्ष काम करतेवेळी शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्रमांक: इएनव्ही-२०१३/ प्र. क्र. १७७ / तां. क. १, दिनांक १० जानेवारी, २०१४मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक: बीडीजी - २०१७/ प्र. क्र. ६०/ इमा-२, दिनांक ०७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

ई. नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुनच सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

फ. सदर अंदाजपत्रकावर उपभोक्ता विभागाच्यावतीने सक्षम प्राधिका-याचे साक्षांकन आवश्यक आहे.

११. सदर ज्ञापन शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १७ एप्रिल, २०१५ व २० सप्टेंबर, २०१९ यातील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०७०९१२२३२५६४२२ असा आहे. सदर ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN VILAS SHISHUPAL

Digitally signed by PRAVIN VILAS SHISHUPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=e90b11f238d671a8222f53575baf1f02e1625f1f53f35c695b531bcd5b6b83fa, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CBD05D0EA86861C0C1248FD89817636DDFBE5E50BA12759A0FE7E022D790310B, cn=PRAVIN VILAS SHISHUPAL
Date: 2024.07.09 12:34:34 +05'30'

**( प्रविण शिशुपाल )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर,
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर,
४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (विद्युत) विभाग, छत्रपती संभाजीनगर,
५. प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, छत्रपती संभाजीनगर,

६. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, छत्रपती संभाजीनगर,

७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, छत्रपती संभाजीनगर,

८. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, छत्रपती संभाजीनगर,

९. उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, फर्दापूर, जि. चंद्रपूर,

१०. ग्रामसेवक, ठाणा, फर्दापूर, ता. सोयगांव, जि. छत्रपती संभाजीनगर.